# चतुर्थ खंड

—०—

## [ गजाननचरित्र ]

### वशिष्ठ–दशरथराजा–तिथी देवीची उत्पत्ति

सूत :– शौनकादिमुनींनो ! महोदरचरित्र ऐकल्यानंतर दक्षाने मुद्गलाला विनंती केली की, ब्रह्मरूप गणपति देहधारी कां झाला व त्याने आणखी अवतारकृत्ये कोणती केली त्यांच्या कथा मला सांगा. तेव्हां ती विनंति ऐकून मुद्गलाने प्रथमतः ब्रह्मस्वरुपाचे वर्णन केले व पुढे सांगितले की, पूर्वी सृष्टि उत्पन्न केल्यावर ब्रह्मदेवाने गणपतीचे चिंतन केले; त्याला गणेशब्रह्माची कीर्ती कशी वाढेल याची चिंता होती. तो एकदा ध्यानस्थ झाला असता त्याच्या शरीरापासून चतुष्पाद, चतुर्हस्त, चतुर्मुख व अति सुंदर अशी पराप्रकृतीची एक मूर्ति निर्माण झाली तिने ब्रह्मदेवास नमस्कार केला, अनेक स्तोत्रे ह्मणून त्यास प्रसन्न करून घेतले आणि 'मला काय आज्ञा आहे ? मी कोठे राहूं ? व खाऊ काय हे सर्व मला सांगा ' अशी विनंती केली. ब्रह्मदेवाने तिला सांगितले की, गणपतीची तपश्चर्या करून आश्चर्य उत्पन्न करणारी सृष्टि करण्यास प्रारंभ कर. ही आज्ञा घेऊन ती वनात गेली. तिने उग्र तपश्चर्येने गणपतींला प्रसन्न करून घेतले

व सृष्टिकर्तुत्व सामर्थ्य मिळविले. प्रसन्न झालेले गणपति तिला ह्मणाले, ' तूं मला चार प्रकारांनी प्रिय होशील. १ ) सर्व तिथींची तू माता होऊन तुला चतुर्थी ह्मणतील. २ ) तुझा डावा भाग काळा असेल व उजवा भाग पांढरा असेल. ३ ) चतुर्थी हीच माझी जन्म-तिथि होईल आणि ४ ) जे लोक चतुर्थी व्रत करतील, त्यांचे मी पालन करीन. ' असे वर तिला देऊन गणपति अंतर्धान पावले. नंतर या परा ( अर्धी शुक्ल व अर्धी कृष्ण ) प्रकृतीने गणपतीचे ध्यान करून सृष्टिरचनेस आरंभ केला.

## चतुर्थीव्रताचें माहात्म्य

प्रथमतः तिच्या शरीरापासून सर्व तिथी उत्पन्न झाल्या. या तिथींसंकट चतुर्थी तिथी गणपतीची तपश्चर्या करू लागली; व गणपति प्रसन्न झाल्यावर तिने वर मिळविला की, ' कृष्णचतुर्थी व शुक्लचतुर्थीच्या दिवशी उपवास करून माझी उपासना जे करतील त्यांस मी उत्तम प्रकारचे सुख देइन व त्यांच्या सर्व संकटांचे हरण करीन. त्या माझ्या भक्तांना येथील सर्व सुखांचा उपभोग मिळून अंती ते स्वानंदलोकाला जातील. हे चतुर्थी ! माझी कृष्ण-चतुर्थीला पूजा करून रात्री चंद्रोदय झाल्यावर पंक्तीला कांही ब्राह्मण घेऊन भोजन करावे. शुक्ल चतुर्थीला दुपारी माझी पूजा करून उपवास करावा व दुसरे दिवशी पारणे सोडावे. रात्री माझ्या कथा गाव्या. ही दोन्ही व्रते जे करतील ते माझे भक्त सर्व देवास मान्य होतील ' असे ह्मणून व दुसऱ्याही तिथीस योग्य-अयोग्य व्रते सांगून व त्यांची फळे सांगून गणपति अंतर्धान पावले.

## चतुर्थीव्रताचा शास्त्रार्थ–चतुर्थीव्रतविधी

सूत :– मुनीहो; नंतर मुद्गल दक्षाला दशरथाची गोष्ट सांगताना ह्मणाले, दक्षा ! दशरथराजाला पुष्कळ दिवस मूल झाले नाही, ही गोष्ट तुला माहीतच आहे. आपल्याला संतति नाही असे पाहून अति दुःखित झालेला राजा, वसिष्ठ ऋषीला शरण गेला आणि 'मला पुत्रप्राप्ति होईल असा कोणता तरी एक उपाय सांगा.' अशी करुण स्वराने त्याने मुनीची प्रार्थना केली. वसिष्ठाने दशरथाला संकष्टी चतुर्थीचे व्रत, त्याचा विधि व त्याचे फल इत्यादि सर्व विस्ताराने सांगून शेवटी ह्मटले की, 'ह्या व्रताचे तू एकनिष्ठेने पालन केलेस तर तुझ्या सर्व कामना पूर्ण होतील.' त्यांनी दशरथाला चतुर्थीचा शास्त्रार्थ असा सांगितला की, चंद्रोदयाचे वेळी चतुर्थी तिथि नसेल तर, प्रदोषकाळी चतुर्थी असेल तो दिवस उपवासाचा समजावा. दोन्ही दिवस चंद्रोदयी चतुर्थी असेल तर कोणत्याही दिवशी उपवास केल्यास हरकत नाही. याचप्रमाणे जी शुक्लचतुर्थी मध्यान्हव्यापिनी असेल ती उपवासाची तिथि असे समजावे. असा शुक्लचतुर्थीच्या व्रताचा शास्त्रार्थ सांगून, 'हे व्रत पूर्वी विष्णुशंकरादि देवतांनी केले आहे, असे सांगितले. दशरथाने विचारले 'ब्रह्मादिकांनी चतुर्थी व्रत कसे केले ते मला कृपा करून सांगा.' राजाचा हा प्रश्न ऐकून वसिष्ठऋषि ह्मणाले 'एकदा सृष्टिप्रलय होऊन सर्व स्थावरजंगम पदार्थ ब्रह्मामध्ये लीन झाले असता व गणपति योगनिद्रा घेत असता, वेदमंत्रानी गणपतीस जागे केले, आणि त्यांनी सत्व, रज, तम, ह्या गुणांच्या साहाय्याने ब्रह्मा, विष्णु, शिव, शक्ति व सूर्य हे प्रमुख देव उत्पन्न केले. ह्या देवांनी एकाक्षरी मंत्राचा आश्रय घेऊन, उत्तम तपश्चर्या केली आणि

गणपतीस प्रसन्न करून घेऊन सर्वज्ञत्व प्राप्त करून घेतले. देवांनी कर्मभूमीवर स्वानंदनामक गणेशक्षेत्राचे ठिकाणी भाद्रपद शुक्ल चतुर्थीच्या दिवशी मध्यान्हकाळी गणपतीची स्थापना केली व तेथेच आराधना करीत हे पांचही देव राहिले. पुढे माघ शुक्ल चतुर्थीला गजानन प्रकट झाले व देवांस वरप्रदान देते झाले, ह्मणून माघी शुक्ल चतुर्थीचे माहात्म्य पृथ्वीवर प्रकट झाले. तथापि भाद्रपद शुक्ल चतुर्थीचे व त्या दिवशी मंगळवार असेल तर त्या चतुर्थीचे माहात्म्य काही विलक्षण आहे. कमी अधिक मानाने वर्षांतील बारा महिन्यांच्या तथापि सर्व चतुर्थ्या पुण्य दिवसच आहेत. संकष्टी चतुर्थीचेही माहात्म्य श्रवणीय आहे. जन्म, मृत्यु आदि तीन अवस्था व चवथे कर्मांपासून उत्पन्न होणारे फळ, ही चार संकटे जीवाला वेडावून सोडतात. ह्या संकटांचा कृष्ण चतुर्थी नाश करते ह्मणून तिला संकष्टी चतुर्थी ह्मणतात; मंगळवारी चतुर्थी आली तर तिचे माहात्म्य जास्तीच असते. कारण पृथ्वीच्या उदरी उत्पन्न झालेला भौम ( मंगळ ) याने, 'गणानां त्वां' या मंत्राने गणपतीची पूजा करून, रमणीय तपाचे आचरण शंभर वर्षेपर्यंत एकनिष्ठेने केले व गणपति प्रसन्न झाल्यावर त्यापाशी मागणे मागितले की 'मी मर्त्यदेहामध्ये उत्पन्न झालो आहे तरी मला अमृतपान करण्याची इच्छा आहे; ती पूर्ण करा; माझी ग्रहमंडलांत योजना करा; मंगल या नावाने माझी प्रसिद्धी होऊं द्या. सर्वांचे ऋण नाहीसे करण्याचे सामर्थ्य मला येऊं द्या व मंगळवारी जी चतुर्थी येईल तिचे माहात्म्य जास्त असूद्या.' हे ऐकून गणपतीस संतोष झाला व भौमाने ह्मणजे मंगळाने मागितलेले सर्व वर गणेशांनी त्यास दिले.

## गणेशचतुर्थी आणि चंद्रदर्शन–चंद्रकृत गणपतीचा उपहास–गणपतिशाप व उःशाप

सूतः- मुनिहो ! भाद्रपद शुक्ल चतुर्थीच्या दिवशी चंद्राचे दर्शन का घेऊ नये, याचे कारण व त्याची कथा वसिष्ठांनी दशरथास सांगितली ती ऐका. ' एकदा देवासह मुनीनी असा निश्चय केला की, ज्याअर्थी गणपतीपासूनच ब्रह्मादि देवपंचक निर्माण झाले आहेत, त्याअर्थी त्या पंचकाचेही जर आपण भजन पूजन केले तर आपण कृतकृत्य होऊ. ' असा अज्ञान बुद्धीने निश्चय करून ते भ्रमिष्ट झाले आणि आपल्या निश्चयाप्रमाणे आचरण करावयास लागले. हे मुनीचे व देवपंचकाचे अज्ञान नाहीसे करावे ह्मणून गणपतीनीं एक अक्राळविक्राळ रूप धारण करून, शंकरादि देवपचकास, इतर देवांस व ऋषीस मूर्छित केले काही वेळाने सावध झाल्यावर व आपल्या मूर्छित स्वरुप ध्यानात आल्यावर शंकरादि देवपचक स्वतंत्र नाही, परतंत्र आहे; सर्व गणपतीच्या स्वाधीन आहे, असे त्यास व देवपंचकास ज्ञान झाले. नंतर त्यानी गणपतीचे स्तवन करण्यास आरंभ केला. त्यांचे हे स्तवन भक्तिपूर्वक आहे असे पाहून गणपति प्रसन्न झाले आणि त्यांचा भीतीचा नाश व्हावा म्हणून त्यांनी आपले विक्राळ स्वरूप सोडून देऊन सौम्य रूप धारण केले. देवांनीं पुन्हा गणपतीची पूजा केली आणि ब्रह्मदेवाने आपली कन्या सरस्वती, विष्णूने पुष्टि, शंकराने योगिनी, जमदंबिकेने मोहिनी व सूर्याने संजीवनी अशा आपआपल्या मानस कन्या गणपतीला अर्पण केल्या गणपतीने त्यांस उपदेश केला. देवहो ! तुम्ही माझे केवळ अंश आहांत. तुम्ही मत्तंत्र आहांत, स्वतंत्र नाही,

हे ध्यानांत ठेवा, गर्व करूं नका. मी तुमच्यासारखा देहधारी होतो तो केवळ भक्तांची संकटे दूर व्हावी म्हणून होतो; हे विसरूं नका. मी अनंत ब्रह्मांडाचा नायक आहे; माझी पूजा केली तर जगद्ब्रह्माची पूजा केली असे होईल, हे नीट समजून घ्या ' असे बोलून गणपति स्तब्ध झाले. देवांनी पश्चात्तापपूर्वक गणपतीला नमस्कार करून आपल्या अपराधाची क्षमा मिळविली. इतक्यात तेथे शंकराच्या भालप्रदेशी वास्तव्य करणारा चंद्र, हा गणपतीची ती विद्रुप मुर्ति पाहून उन्मत्तपणाने हंसला व हे 'आपण हत्तीचे तोंड का धारण केले ?' असे उपहासाने विचारू लागला! प्रथमतः गणपतीने त्याकडे लक्षच दिले नाहीं. पण तो अधिकच धिटाई करून पुनःपुनः तेच तेच विचारू लागला. तेंव्हा त्याला शुद्धीवर आणावा म्हणून गणपति रागावले; त्यांनी त्यास शाप दिला की; 'तूं ज्याच्या दृष्टीस पडशील ते लोक पापी होतील व त्यांच्यावर अनेक संकटे येतील!' असा शाप देऊन गणपति अंतर्धान पावले. त्या दिवसापासून शंकरादि देवांचा अभिमान व अहंकार विगलित होऊन ते गणपति-भक्त झाले, पण खिन्नमनस्क चंद्र मात्र आपल्या बायकांसह अति दुःखी झाला. तो घरी आला व गणपतीचा 'मी विनाकारण उपहास केला' असा त्यालां पश्चात्ताप झाला. नंतर तपश्चर्या करून गणपतीला प्रसन्न करून घेण्यावरता व आपण त्याच्या केलेल्या अपराधाबद्दल क्षमा मिळविण्याकरता असे हे दोन संकल्प करून चंद्र गंगातीरी आला. तेथे त्याने अठरा अक्षरी गणपति-मंत्राचा जप केला व उत्तम प्रकारची तपश्चर्या केली. शंभर वर्षांनी गणपति प्रसन्न झाले. इकडे चंद्र नाहीसा झाल्यामुळे जगात सर्वत्र दुःखप्रसार झाला. सूर्याच्या तेजाने सर्व चराचर भाजून निघाले

आणि देवगणांसही अत्यंत भीति उत्पन्न झाली. ह्या संकटाचा परिहार करण्यासाठी देव उद्युक्त झाले, म्हणजे गणपतीला संतुष्ट करून, चंद्राला शापविमुक्त करण्याकरता सर्व देवांनी तपश्चर्या केली. चंद्राने व शंभुप्रमुख देवांनी शंभर वर्षे तपश्चर्या केली. तेंव्हा कोठे गणेशब्रह्म प्रसन्न झाले! गणपति प्रकट झाल्यावर 'अथर्वशीर्ष मंत्र' ह्मणून देवांनी परमेश्वराची स्तुति केली आणि मागणे मागितले की, 'कृपा कर आणि चंद्राला दोषमुक्त करा' हे ऐकून प्रसन्न झालेल्या गणपतींनी सांगितले की, 'भाद्रपद शुद्ध चतुर्थी हा माझा आवडता दिवस आहे, त्या दिवशी मात्र चंद्राकडे कोणीही पाहता कामा नये. ज्या दिवशी चंद्राने माझा उपहास केला त्या दिवशी भाद्रपद शुद्ध चतुर्थीच होती, म्हणून त्या दिवशीही चंद्राचे अवलोकन करू नये. तुमची व त्याची तपश्चर्या पाहून मी संतुष्ट झालो आहे व त्याला जो मी शाप दिला होता, त्यापासून त्याला मुक्त केला आहे. कारण त्याला खरा खरा पश्चात्ताप झाला आहे. एक दिवस मात्र त्याचे दर्शन पापकारी होईल. ह्या वरून हे ध्यानात ठेवा की, तिरस्कारपूर्वक कोणाचाही उपहास कोणीही केला तरी, त्याला कर्मभूमीवर किंवा स्वर्गलोकी, या जन्मी किंवा दुसऱ्या जन्मी, प्रायश्चित्त मिळतेच मिळते. देवहो! हा उपदेश विसरूं नका. त्या वेळी चंद्रानेही भक्तिपूर्वक गणपतीची स्तुति केली. ती ऐकून गणपति प्रसन्न झाले. त्यांनी त्याला वर दिला की, 'तुला माझ्या भालप्रदेशी वसतिस्थान मिळेल, व प्रत्येक कृष्ण चतुर्थीला तुझे पूजन करून मग माझ्या व्रताची सांगता लोक करतील. याचप्रमाणे प्रत्येक शुद्ध द्वितीयेला संध्याकाळी लोक तुला नमस्कार करतील; कारण शुक्ल

द्वितीयेच्या संध्याकाळी तू माझी प्रसन्नता संपादन केली आहेस.' राजा! गणपतीला भालचंद्र का ह्मणतात त्याचे कारण तुला आता समजले असेलच. असो,

## कृष्ण, गणेशचतुर्थीला चंद्र पाहतो–स्यमंतक मण्याची कथा–कृष्णजांबवंत मल्लयुद्ध–कृष्णाची खिन्नता–कृष्णकृत गणपत्युपासना–वरप्रदान

एकदा यादवकुलांत अवतीर्ण झालेल्या वासुदेवाने, भाद्रपद शुक्ल चतुर्थीला चंद्राचे दर्शन घेतले तेंव्हा त्याचे अंतर्ज्ञानच नाहीसे झाले व तो सामान्य पुरुषासारखा एक पुरुष झाला. या चंद्रदर्शनाच्या पापाने त्याच्यावर एक संकट आले ते असे: यादवकुलामध्येच सत्राजित या नावाचा राजर्षि होता. त्याने शंभर वर्षे दारुण तपश्चर्या करून सूर्यास प्रसन्न करून घेतले होते व सूर्यापासून स्यमंतक या नावाचा एक मणि मिळविला होता तो मणि तेजाने प्रतिसूर्य होता व त्यापासून प्रतिदिवशी आठ मण सोने उत्पन्न होत असे! अर्थातच अशा मौल्यवान मण्याची तो रोज पूजा करीत असे व त्यास अतिशय जपत असे कांही दिवस गेल्यानंतर कृष्णाला या मण्याचा लोभ उत्पन्न झाला व सत्राजितास बोलावून 'हा तुमचा स्यमंतक मणि आम्हाला द्या' अशी मागणी केली. सत्राजित ह्मणाला, 'माझेजवळ तो मणि नाही माझा धाकटा भाऊ प्रसेन याच्याजवळ तो मणि असून तो मलाच देईनासा झाला आहे!' असे ह्मणून सत्राजित घरी गेला. कृष्णाच्या मनात मात्र ती गोष्ट राहिली. पुढे एकदा सर्व यादव मृगयेकरिता रानात गेले, त्याबरोबर प्रसेनही ते दिव्यरत्नाचे पदक गळयात बांधून शिकारीला गेला.

शिकार करीत असता प्रसेन सिंहाच्या मागून धावत एकटाच लांबवर गेला. तो एकटा आहे असे जाणून, सिंहाने किरण साधून त्याच्यावर उडी मारली व घोड्यासकट प्रसेनाला आपल्या गुहेत नेऊन ठार मारले; पण त्या सिंहाची रामअवतारातील जांबवानाशी गाठ पडून युद्ध झाल्यावर सिंह मेला, व जांबवानाने तो मणि घेऊन आपल्या मुलीस दिला. इकडे यादव संध्याकाळी परत आले, पण प्रसेन आला नाही; हे पाहून सत्राजिताला सशय आला की, मण्याच्या लोभाने कृष्णाने प्रसेनास मारले असावे. त्याचे म्हणणे ऐकून उग्रसेनादि यादवांसही वाटले की मण्याच्या लोभाने कृष्णाने प्रसेनास मारले असावे. पुढे सर्वच लोक कृष्णाची निंदा करू लागले. यामुळे कृष्णास काही सुचेना. शेवटी देहत्याग करण्याचा त्याने निश्चय केला; तथापि प्रसेनाचा एकदा शोध करावा असे त्यास कोणी सांगितल्यावरून स्वदेह त्यागाचा बेत मागे टाकून तो अरण्यात गेला. तेथे घोडा, प्रसेन व सिंह यांची प्रेते पाहून, परंतु मणि तेथे नाही व अस्वलाच्या पावलांच्या मागाने जांबवानाच्या भुयारापर्यंत गेला; आणि आंत प्रवेश करून बराच पुढे गेला. भूमीच्या पोटात ती गुहा पुष्कळ खोल असताही तेथे उत्तम प्रकारचा प्रकाश पाहून आपल्याला येथे हरवलेला मणी सांपडेल असे कृष्णास वाटले आणि तो पुढे गेला. तेव्हा त्याला दिसले की पाळण्यावर तो मणी टांगलेला आहे. मण्याचा शोध लागला हे पाहून कृष्णाला अतिशय आनंद झाला. इतक्यात तेथे जांबवानाची मुलगी बाहेर आली. तिने आपल्या घरात परका पुरुष शिरला हे पाहिले तेंव्हा ती भयाने ओरडावयास लागली. तिचा तो आक्रोश ऐकून जांबवान स्वतः बाहेर आला तो मुलीच्या ओरडण्याने रागावलेलाच होता. त्यात हा मनुष्यप्राणि

आपल्या बिळात न विचारता आला, हे पाहून त्याचा क्रोध जास्तच वाढला. कृष्णालाही मणि प्राप्तीसाठी जांबवानाशीं युद्ध करावयाचेच होते. झाले. दोघांचे युद्ध जुंपले. एकवीस दिवस घोर युद्ध झाले. इकडे एकवीस दिवस वासुदेव परत आला नाही म्हणून वसुदेवादि सर्व कृष्णपक्षाच्या यादवांस अतिशय दुःख झाले. सर्वांनी सत्राजितावर शिव्यांचा वर्षाव केला. इकडे एकवीस दिवस झाल्यावर जांबवानाने पाहिले की आपल्या हातून आपल्या प्रतिपक्षाचा पराभव होणे शक्य नाही. असा निश्चय झाल्यावर 'तूं कोण आहेस?' असे त्याने कृष्णास विचारले. कृष्णाने उत्तर दिले. 'माझे नाव कृष्ण, व माझा जन्म यदुकुलांत झाला आहे.' हे उत्तर ऐकून जांबावनाला अति वाईट वाटले. त्याला पश्चाताप झाला. त्याने कृष्णाला साष्टांग नमस्कार घातला; आणि म्हणाला "भगवंता! आपण प्रत्यक्ष विष्णूच आहांत. 'पुनः माझे कृष्णवतारी दर्शन होईल' असे रामानी मला सांगितलेले आता मला आठवते. मी आपला दास आहे. मला क्षमा करा. केवळ अज्ञानाने व शक्तीच्या गर्वाने मी आपल्याशी युद्ध केले! प्रभो! मला आपण क्षमा करा" पुढे त्याने कृष्णाची आणखी पुष्कळ स्तुति केली, पूजा केली आणि मण्याचा वृत्तांत ऐकल्यावर आपल्या कन्येसह तो स्यमंतक मणि कृष्णास अर्पण केला. पुढे लवकरच जांबवतीला घेऊन कृष्ण द्वारकेला परत आला; आणि घडलेली हकीगत सांगून सर्व लोकांदेखत सत्राजिताला तो स्यमंतक मणि त्याने दिला. सत्राजितालाही कृष्णाच्या विरोधाचे भयच वाटत होते; म्हणून आपली कन्या सत्यभामा ही कृष्णाला अर्पण करून तिच्या बरोबर हा स्यमंतक मणि कृष्णाला

अर्पण केला. कृष्णाने तो मणि सत्यभामेजवळ ठेवावयास दिला, व 'हा माहेरींच ठेवीत जा.' असें सांगितलें. ही गोष्ट झाल्यानंतर दोन तीन दिवसांनी अशी बातमी आली की 'पांचही पांडवास पुरोचनानें लाक्षागृहामध्ये जाळून टाकलें. हें ऐकून कृष्ण-बलरामास दुःख झालें व ते हास्तिनापुरास गेले, व पांडवांसाठी पुष्कळ शोक करून त्यांच्या मातृःश्रीचे-कुंतीचे, समाधान करण्यासाठी तेथेंच राहिले. इकडे शतधन्वा, कृतवर्मा इत्यादि कांहीं यादवांनी विचार केला कीं, 'सत्राजितापाशी आम्हीं सत्यभामेकरितां मागणी घातली असतांही आम्हांस टाकून त्याने कृष्णाला अर्पण केली. कृष्ण व बळराम हे दोघे हस्तिनापुरी शोक करीत पडले आहेत. आपण आता रात्री सत्राजिताला मारून सत्यभामेचा मणि घेऊन जाऊं या.' त्याप्रमाणे त्यांनी वेळ साधून सत्राजिताला ठार मारलें व ते तिघे तो मणि घेऊन गेले. हा वृत्तांत ऐकून कृष्ण परत आला. तेव्हां शतधन्व्यास व कृतवर्म्यास भीती उत्पन्न होऊन त्यांनी तो मणि अक्रूरापाशी ठेवण्यास दिला; व आपण पळून गेले. कृष्णाने त्यांचा पाठलाग केला व त्यांचा पराभव करून त्यास भूमीवर पाडलें, त्यांचा झाडा घेतला; पण त्यांच्याजवळ ता मणि नव्हता! असें पाहून कृष्णाला पुन्हा अतिशय दुःख झालें. बलराम तेथे आला तेंव्हा कृष्णाने त्यास मण्याची हकिगत सांगितली. बलराम ह्मणाला, 'कृष्णा, तूच हा मणि कोठे तरी लपवून ठेवला आहेस व मला तो मणि द्यावा लागेल ह्मणून स्यमंतक मणिच सापडत नाही अशी खोटीच ओरड करीत आहेस!' असें ह्मणून

व कृष्णाच्या शब्दाकडे लक्ष न देता बलराम निर्दय मन करून विदर्भ नगरीला निघून गेला. ह्या बंधुवियोगाने तर कृष्णास अतिशय खेद झाला. द्वारकेतील यादव, देशोदेशींचे राजे व लोक हे सर्व कृष्णाची निंदा करू लागले. हा सर्व तिरस्कार कृष्णास असह्य झाला. तो दिवसें दिवस खंगत चालला व त्याने देहत्यागाचा संकल्प केला. ही त्याची अवस्था ऐकून नारद तेथे आले. त्यांनी कृष्णाची हकीगत ऐकून त्यास सांगितले की 'भाद्रपद शुद्ध चतुर्थीला तु चंद्राचे दर्शन घेतलेस ह्मणून गणपतीचा राग तुझ्यावर झाला आहे व तू ह्या दुःखपरंपरेत सापडला आहेस. कृष्णा तूं! देहत्यागाची बुद्धी टाकून दे आणि संकष्टी चतुर्थीच्या व्रताने गणपतीला प्रसन्न कर. यायोगे तुझ्यावर आलेला खोटा अपवाद बंधूचा वियोग, व स्वजन निंदा, इत्यादि जी संकटे तुझ्यावर आली आहेत. त्यांचा परिहार होईल.' हा उपदेश करून नारदाने कृष्णाला एकाक्षरी गणेशमंत्राची दीक्षा दिली. ह्या मंत्राने प्रत्यही गणपतीची पूजा करून संकष्टीचें व्रत धरून व रात्री गणपतीचे ध्यान करून, कृष्णाने गणपतीला प्रसन्न केले. प्रकट झाल्यावर गणपतींनी 'तुझ्या सर्व संकटांचा नाश होईल, तुझा स्यमंतक मणि तुला मिळेल. तुझे पूर्ण ज्ञान पुनः तुला प्राप्त होईल आणि तुझी अखंड कीर्ती होऊन अंती तूं माझ्या लोकाला येशील!' असे वर देऊन गणपति अंतर्धान पावले व कृष्णावरील आलेल्या विघ्नपरंपरेचा हळुहळू लय होत गेला. असो ह्याप्रमाणे ही चंद्रदर्शनाची कथा सांगतली.

# चतुर्थीव्रताचे फल

**सूत** :– एकदा, वसिष्ठांनी दशरथास सांगितले की, ' पूर्वी शंकरादिदेवांनी, तसेंच स्वायुंभव मनूने व दुष्यंताचा मुलगा जो भरत त्याने, हे चतुर्थीचे व्रत करून उत्तम उत्तम फळे मिळविली आहेत. राजा ! दुष्यंताचा मुलगा भरत हा उत्तम प्रकारे पृथ्वीचे राज्य करीत असता अकस्मात त्याच्या राज्यात एक मोठा दुष्काळ पडला. त्याने पुष्कळ दैवी व मानवी उपाय केले, पण दुष्काळाचा जोर कमी होईना. भरत राजा अगदी निराश झाला व राज्य सोडून देण्याचा संकल्प केला. पण प्रभुकृपेने त्याची व कण्वमुनीची गाठ पडली. राजाने सांगितलेली कथा ऐकून मुनि ह्मणाले, ' तुझी प्रजा वर्णाश्रम धर्माने चलते, तूही स्वधर्माने वागून देव, गुरु, अतिथि व दीन ह्यांचा उत्तम सत्कार करतोस, हे सर्व ठीक आहे; पण तुझ्या राज्यावर सुदैवाचा अनुग्रह नाही. हे समजून घे आणि आपल्या राज्यांत चतुर्थीव्रताचा सर्वत्र विस्तार होईल अशी व्यवस्था कर. राजा ! मी पूर्वी पुष्कळ तपार्जन केले असताही मला शांति मिळेना ह्मणून मी क्रतूला शरण गेलो आणि ' शांति मिळविण्याचा उपाय मला सांगा ' अशी त्याला विनंती केली. नंतर त्याने मला गणेश-ब्रह्माचे माहात्म्य सांगितले, क्रतूला हे ज्ञान ब्रह्मदेवाने दिले होते. क्रतूचा उपदेश ऐकून मी एकाक्षरी गणेशमंत्राचा जप केला व गणपतीचे ध्यान केले. तेंव्हा माझ्या चित्तभूमीची चंचलता व अनेकत्व नाहीशी होऊन माझे चित्त चिंतामणीचेठायी सायुज्यता पावले. पुढे कांही दिवसांनी मला गणपतीचा साक्षात्कार झाला. गणपतीनी मला सांगितले की, ' तू चतुर्थीव्रताचा स्वीकार कर ह्मणजे तुझ्या सर्व

संकटांचा परिहार होऊन तुला शांति मिळेल. राजा ! ह्याप्रमाणे मला आता शांति मिळाली आहे, तूही स्वनगरीस जा, व चतुर्थीव्रत यथासांग कर ह्मणजे तुझ्या सर्व संकटांचा परिहार होऊन तुला शांति मिळेल.' हा उपदेश ऐकून राजाला मोठा आनंद झाला. परत स्वराज्यांत आल्यावर त्याने चतुर्थीव्रताचा स्वीकार केला व राज्यात सर्वत्र करविला. त्यायोगे पृथ्वीवरील सर्व संकटे अस्तंगत झाली आणि सर्वत्र शांतीचे राज्य झाले दशरथराजा ! भाद्रपद शुद्ध चतुर्थीला उपवास घडला असता काय फलप्राप्ति होते ती ऐक. पूर्वी द्राविड नगरामध्ये कोणी एक पापी चांडाळ राहात होता. त्याला कुष्ठरोग झाला होता, तरी त्याला परस्त्रीगमनाची इच्छा अनावर होत असे. एकदा असा चमत्कार झाला की, त्याला भाद्रपद शुद्ध चतुर्थीचे दिवशीच पहाटेच्यावेळीं सडकून ताप भरला. सगळा दिवस व सगळी रात्र त्याचा ताप निघाला नाही. अर्थातच त्याने त्या दिवशी खाणेपिणे काही केले नाही. पंचमी उजाडते न उजाडते तो त्याचे प्राणसंक्रमण झाले, ह्मणजे तो पंचत्व पावला. आणि त्या पाप्याला नेण्याकरिता गणेशदूत विमान घेऊन आले व ते त्याला स्वानंदलोकास घेऊन गेले ! तेथे ह्या चांडाळाला ब्रह्मज्ञान झाले व तो ब्रह्म झाला. राजा ! केवळ अज्ञानाने चतुर्थीव्रत आपल्या हातून घडले ह्मणून जर ब्रह्मलोक प्राप्ति होते तर या चतुर्थीव्रताचे विधियुक्त, ज्ञानपूर्वक आणि श्रद्धापूर्वक अनुपालन झाले असता आपल्या सर्व संकटांचा परिहार होऊन, आपल्या सर्व मनकामना पूर्ण होऊन आपल्यास स्वानंदलोकाचा अधिगम का होणार नाही ? राजा ! ह्याकरिता भाद्रपद शुद्ध चतुर्थीचे दिवशी मृण्मय गणेशमूर्ति करून प्राणप्रतिष्ठापूर्वक तिची स्थापना करावी. त्या दिवशी उपवास करावा

आणि दुसरे दिवशी चतुर्थीव्रताची सांगता करून ब्राह्मणांसह पारणा करावी. त्यायोगे सर्व संकटांचा परिहार होईल."

सूतः– मुनीहो ! ह्याप्रमाणे दशरथराजाला वसिष्ठांनी बारा महिन्यांच्या शुक्लचतुर्थीचे माहात्म्य सांगून प्रत्येक शुक्लचतुर्थीला उपवास घडला असता महापापी लोकांचासुद्धा उद्धार होऊन ते स्वानंदलोकाला जातात असे सांगितले, व मलमासाची म्हणजे अधिक मासाची कथाही ह्याचप्रमाणे सांगून ह्या सर्व कथांच्याद्वारे चतुर्थीव्रतावरील दशरथाची श्रद्धा दृढ केली. पुढे दशरथाने संकष्टीचतुर्थी व्रताचा इतिहास विचारला. तेंव्हा वसिष्ठ म्हणाले, 'राजा ! गणपतीच्या चतुर्थीव्रताविषयींची ही तुझी श्रद्धा पाहून मला फार आनंद होतो. महात्मा श्रींगणेश ह्यांच्या कथेविषयीं आदर उत्पन्न होण्याला पूर्वपुण्याचा मोठाच संचय असावा लागतो. राजा ! तूं सर्व प्रकारे धन्य आहेस. कृष्णचतुर्थीसंबंधाने तुझा प्रश्न आहे. तदनुसार या महा-पुण्यकारक चतुर्थीव्रताचीं तुला कथा सांगतो. ऐक : सहस्राख्य नगरीमध्ये शूरसेन नांवाचा एक राजा होता. त्याला गायनशास्त्राचा अतिशय हव्यास होता. एके दिवशी सभेमध्ये त्याच्या समक्ष गायनशास्त्राची चर्चा चालली असता राजांगणामध्ये एक उज्वल व अति देदीप्यमान विमान एकदम खाली आलेले सभासदाच्या दृष्टीस पडले. जवळ जाऊन हा काय चमत्कार आहे हे पाहण्यासाठी आपल्या मंत्रीगणासह वर्तमान राजा सभेतून उठला, व विमान उतरले होते तेथे आला. सहस्राख्य नगरींतील सर्व नागरिकही त्या ठिकाणीं जमा झाले. राजा विमानाजवळ गेला तेंव्हा देवगणांसह देवाधिपति इंद्र विमानात बसून आला आहे असे त्यास दिसले. राजाने इंद्राला दंडवत् घातला आणि

उठून व हात जोडून इंद्राला मोठ्या विनयपूर्ण वाणीने म्हणाला, ' देवा ! धन्य मी की आपले दर्शन मला आज झाले ! माझ्या नगरीला आपल्या चरणांचा स्पर्श झाला व माझ्या प्रासादाने आपल्या चरण-रजाच्या संगतीचे सुख अनुभवले ह्यावरून मी खरोखर कृतकृत्य झालो आहे. हे प्रभो ! आपण आलात कोठून, जावयाचे कोणीकडे, आपले हे विमान खाली कसे आले इत्यादि गोष्टी आपण मला सांगाल काय ! आपण वाटेल तो आज्ञा ह्या दासाला करा, हा सेवक आपली इच्छा पूर्ण करण्याला सदैव सिद्धच आहे. महाराज ! कोणाच्या पापाने हे विमान खाली पडले हे मला कृपा करून सांगा ' इंद्र म्हणाला ' राजा ! महापापी नावाच्या एका कैवर्तकाला एका गणेशभक्त ऋषीची गाठ पडली. त्याने त्या कैवर्तकाला गणेशभजनाची व गणेश-पूजनाची दीक्षा दिली. पुढे, त्या महापाप्यांने अनेक सहस्रवर्षे गणप-तीचे एकनिष्ठ आराधन केले ही त्याची अव्यभिचारिणी भक्ति पाहून गणेशब्रह्म प्रसन्न झाले आणि त्यांनी त्या पाप्याच्या सर्व पापांचा संहार करून त्याला ब्राह्मणत्व दिले, त्याला शुंडाधर केले व त्याचे नांव भृशुंडी असे ठेवून ' जगताचा उद्धार करण्याकरिता तूं येथे रहा अशी त्यास आज्ञा केली; ' ह्या आज्ञेप्रमाणे तो ह्या कर्मभूमींवर वास्तव्य करून राहिला आहे. त्याचे दर्शन झाले असता मनुष्य जन्ममरणाच्या चक्रातून मुक्त होतो. मी आज ह्या माझ्या देवमित्रासहवर्तमान भृशुंडीचे दर्शन घेण्याकरिता गेलो होतो. तेथे जाऊन आह्मी त्याची पूजा केली व त्याचा निरोप घेऊन स्वर्लोकास जाण्याकरिता निघालो आहोत. आमचे विमान चालत असतां त्याच्यावर एका महापापी व रोगग्रस्त वैश्याचीं दृष्टि गेली आणि हे विमान खाली पडले ! राजा! तुझ्या राज्यात जर कोणी कृष्णचतुर्थीच्या महाव्रताचे सांगोपांग

अनुपालन करीत असेल व तो धन्य पुरुष आपले पुण्य आमच्याकरिता खर्ची घालण्यास तयार असेल तर मात्र हे विमान येथून हालविता येईल ! व आमच्या विमानाला आमच्या लोकी जाण्याचे सामर्थ्य येईल. या विमानाला गती देण्याला चतुर्थीव्रताशिवाय दुसरे कोणतेही साधन समर्थ नाही. ' इंद्राचे हे भाषण संपते न संपते तो दुसरे एक विमान तेथे येऊन दाखल झाले. त्यावर गणेशदूत बसले होते. ते एका अतिपापी, अंध, रोगयुक्त, दुर्गंधपूर्ण व मद्यपी चांडाळणीला नेण्याकरता आले होते. या चांडाळणींने पौष वद्य तृतीयेला मद्याचे अतिरिक्त पान केले होते. त्यामुळे तिला धुंदी येऊन ती जी एकदा लाकडासारखी निश्चेष्ट होऊन खाली पडली, ती दुसरे दिवशी म्हणजे कृष्ण चतुर्थीला चंद्रोदय झाल्यावर सावध झाली. तिला प्रखर क्षुधा लागली होती. क्षुधाशमनार्थ ती भिक्षा मागण्याकरिता निघाली आणि जे काय मिळाले त्याचे तिने भक्षण केले. वद्य पंचमीला ती पंचत्व पावली. तिला घेऊन जाण्याकरिता ते दुसरे मागाहून आलेले विमान आले होते. ते विमान त्या चांडाळणीला घेऊन जात असता इंद्राच्या विमाना जवळून गेले; तेव्हा इंद्रविमानालाही गति मिळून देवगणासह इंद्र स्वलोकी जाऊन सुखरुप पोचला. शूरसेनराजानेही त्या दिवसापासून संकष्टी चतुर्थीचे व्रत घेतले. पुढे काही दिवसांनी त्या राजाला ब्रह्मज्ञान होऊन तो अखंड शांतीचा अनुभव घेता झाला. त्याला घेऊन जाण्याकरता गणेशदूत विमान घेऊन आले व सर्व लोकासह स्वानंदलोकास जाण्याकरता राजा सिद्ध झाला पण कांही केल्याने विमान जागचे हलेना; तेंव्हा गणेशदूतांनी राजास सांगितले की, त्या वैश्य रोग्याला काढून टाकल्याशिवाय हे विमान जागचे हालणार नाही. हे ऐकून राजाने गणेशदूतास प्रश्न विचारले की,

'ह्या पापी वैश्याची दृष्ट पडल्यामुळे इंद्राचे विमान खाली पडले व आमचे विमान चालत नाही हे काय आहे ? असे ह्याने कोणते महापातक केले आहे ते मला सांगा, ह्मणजे प्रायश्चित्त देऊन याला मी शुद्ध करीन आणि याच्यासह स्वानंदलोकाला जाईन.' गणेशदूतांनी सांगितले की, त्याने पूर्व जन्मी स्वस्त्रीत्याग, वेश्यागमन, चौरकर्म, पितृहत्त्या, मातृहत्यादि महापातके केली होती, आपल्या धर्मपत्नीला ठार मारले होते, गुरुपत्नीवर बलात्कार केला होता, तेव्हा यमलोकी याला अत्यंत यातना झाल्या; पुढे कर्मभूमीवर जन्म होऊन हा चांडाळ रोगाने ग्रासलेला आहे, तरी पापाचरण करण्यास कमी करीत नाही. अद्यापि ब्राह्मणहत्या, परस्त्रीगमन, इत्यादि महापातके ह्याच्या हातून घडतच आहेत. असो; ह्या पाप्याच्या दारुण पातकामुळे इंद्राचे विमान खाली पडले व आपलेवर चढत नाही. राजा ! ह्या चांडाळाचा त्याग कर. हा वृत्तांत ऐकून राजाला अतिशय वाईट वाटले, व अत्यंत करुणाही उत्पन्न झाली. त्याने गणेशदूतास पुन्हा नमस्कार केला व 'ज्याने हा पापी शुद्ध होईल असे प्रायश्चित्त सांगा.' अशी त्याने दूतास विनंती केली. ती ऐकून गणेशदूतांनाही मोठा संतोष झाला. ते ह्मणाले, 'हे शूरसेना ! ह्या प्राण्याला ऐकू जाईल असा गजानन नावाचा गजर करा. गजानन हे नाव चारी वेदांचे सार आहे व ब्रह्मदेव आपल्या चारी मुखांनी ह्याच नावाचा जप करीत असतो. राजा ! ह्याला गजानन हे नाव ऐकूदे ह्मणजे हा पातकापासून मुक्त होईल.' गणेशदूतांच्या उपदेशाप्रमाणे राजाने गणेश नावाचा गजर केला, पुढे, ह्या पापी वैश्यालाही अत्यंत पश्चात्ताप होऊन त्याने गजानन नावाचा जप, संकष्टी चतुर्थीचे व्रत, गणेशपूजन व गणेशध्यान करण्याचा दृढ संकल्प केला, व या संकल्पाप्रमाणे आचरण करून, स्वानंदलोक व अखंड शांति पावला.

सूत :– वसिष्ठाने दशरथाला फाल्गुनातील संकष्टी चतुर्थीचे माहात्म्य सांगितले. त्यात 'पुलस्त्यपुत्र रावण याने सुदारुण तपश्चर्या करून त्रैलोक्याचे राज्य मिळविले; नंतर, पुन्हा अरण्यांत जाऊन ज्ञानयोगाने वेदोक्त ब्रह्माचे एकनिष्ठ चिंतन केले. तथापि शांति मिळेना ह्मणून नारदाच्या सांगण्यावरून रावणाने संकष्टी चतुर्थीच्या व्रताचे अनुपालन करण्यासाठी गणेशब्रह्माचे ज्ञान समजून घेतले व शांति मिळविली; पुढे पूर्वसंचित पापाने त्याला गणपतीचे विस्मरण झाले; त्याने गणपतिव्रताचा त्याग केला; अधर्माचे अवलंबन करून पापाचा फार मोठा संचय केला आणि राजा! दशरथा! तुझ्या पुत्राच्या हातून मरण पावण्याची आपली योग्यता करून घेतली इत्यादि' सर्व पूर्वकल्पातील कथा वसिष्ठांनी दशरथास सांगितली. अशाच बारा महिन्यांच्या बारा कथा दशरथास सांगून वसिष्ठांनी दशरथाची गणपतीवरील श्रद्धा दृढ केली. तसेच मार्गशीर्ष कृष्ण चतुर्थीची कथा सांगत असता, 'अयोध्येचा राजा, सत्यव्रत, धर्मनिष्ठ आणि परोपकारी जो हरिश्चंद्र, त्याचा विश्वामित्राने छळ केला व सर्व राज्य हरण करून घेतले व राजा वनवासात असता मार्गशीर्ष वद्य चतुर्थीला काही खावयास मिळाले नाही, चंद्रोदयापर्यंत त्याला सहज उपवास घडला. चद्रोदय झाल्यावर यदृच्छेने खावयास मिळून चतुर्थीव्रताची सांगता झाली, या त्याच्या पुण्याने विश्वामित्राची छलबुद्धि नाहीशी होऊन राजावर अनुग्रह करावा अशी त्याला प्रेरणा झाली. हरिश्चंद्राने विचारल्यावरून चतुर्थीव्रताचे माहात्म्य ऋषीने राजास सांगितले व त्या दिवसापासून राजा गणेशभक्त झाला.' हीही कथा वसिष्ठांनी दशरथास सांगितली.

## शमी वृक्षाचे माहात्म्य

सूत :– मुनिनो ! नंतर वसिष्ठ ऋषीनी राजास सांगितले: पांचाळ देशामध्ये कोणी एक अग्निहोत्रोत्पन्न ब्राह्मण राहात असे. तो बराच मोठा झाल्यावर त्याला कुष्ट झाले. त्याच्या अंगाला पुष्कळ भोके पडली. त्यांतच किडे पडले व तो अंध झाला ! ते पाहून त्याच्या दुःखी आईबापांनी अत्रिऋषीकडे जाऊन ही मुलांची वार्ता सांगितली आणि त्याला शरण जाऊन 'ह्या रोगावर काही उपाय असला तर कृपा करून सांगा' असे परोपरीने विनविले. अत्रि ऋषीने चतुर्थी-व्रताचा महिमा सांगून 'विधिपुरःसर संकष्टी चतुर्थी करा' व त्या मुलाला 'शमी वृक्षाच्या शेजारी नेऊन ठेवा' असे सांगितले. आईबापांनी त्याप्रमाणे केले व मुलाला गजानन नावाचा जप करण्यास सागितले. तो मुलगा कृष्णचतुर्थीच्या प्रातःकाळपासून रात्री चंद्रोदय होईपर्यंत उपवासव्रत करून गणपति नावाचा जप करीत शमी-वृक्षाखाली राहिला. याप्रमाणे काही चतुर्थ्या गेल्यावर बापाने मुलाला घरी आणून पाहिले तो त्याला दिसले की, मुलाची दृष्टि साफ झाली आहे, त्याच्या जखमा भरून आल्या आहेत; कुष्ट नाहीसे होऊन सर्वांग स्वच्छ झाले आहे ! मुलगा सर्वथा बरा झाला असे पाहून आईबापाला अवर्णनीय आनंद झाला. तेव्हापासून त्यांनी निश्चय केला की, प्रत्येक कृष्णचतुर्थीला उपवास करून व गणपतीचे स्मरण करीत तो सर्व दिवस शमीतलाखाली घालवावयाचा. हा नियम त्या कुटुंबाने आमरणात पाळला व ते कुटुंब खूप सुखी झाले.

## कोणत्या चतुर्थीला काय खावे ?

**सूत** :– शौनक ! स्वायुंभुव मनूला इक्ष्वाकु नावाचा एक धनेच्छु मुलगा होता. तो धाकटा होता ह्मणून त्याला राज्य मिळण्याचा संभव नव्हता. पुढे गुरुकृपेने त्याला गणपतिव्रताची दीक्षा मिळाली, व त्याने संकष्टी चतुर्थीचे व्रत घेतले. श्रावण कृष्णचतुर्थीला तो पंचखाद्याचे सात लाडू भक्षण करी. पंचखाद्य ह्मणजे द्राक्षे, साखर, खजूर, खोबरे व खसखस मिळून समप्रमाणाने जो पदार्थ सिद्ध होतो तो. भाद्रपद कृष्णचतुर्थीला दही, अश्विनी निर्जळी कार्तिकीला दूध, मार्गशीर्षीला जल, पौषीला गोमूत्र, माघीला पांढरे तीळ, फाल्गुनीला तूप-साखर, चैत्रीला पंचगव्य, वैशाखीला कमळाचे बी, ज्येष्ठीला गाईचे तूप, आषाढीला मध या पदार्थांचा गणपतीला नैवेद्य दाखवून. चंद्रोदयापर्यंत उपवास करून, व चंद्रोदयी गणेशपूजन करून वर सांगितलेले पदार्थ भक्षण करीत असे. ह्या व्रताच्या प्रभावाने असा चमत्कार झाला की, त्याचा थोरला भाऊ सुद्युम्न हा दैवयोगाने ‘ षला ’ नामक स्त्री झाला व राज्य करण्यास अयोग्य झाला ! त्यामुळे मंत्र्यांनी व पुरोहितांनी सांगितल्यावरून मनूने इक्ष्वाकूला राज्यभिषेक केला. राजा ! ह्याप्रमाणे असाध्य गोष्टीसुद्धा धर्ममार्गाने साध्य करून देणे हा या व्रताचा प्रभाव आहे. राजा ! चतुर्थीव्रत तू करीत नाहीस किंवा तुझ्या राज्यांत कोणीही करीत नाही, ही गोष्ट चांगली नाही. याकरता गणेशव्रताची दीक्षा मी तुला देतो, ती घे. गणपतीची सेवा कर. चतुर्थीव्रत करावयास लाग. कृष्णचतुर्थी दिवशी चंद्रोदयापर्यंत तूं उपवास कर तुला निश्चयाने पुत्रप्राप्ति होईल.’ हे ऐकून राजाला आनंद झाला. वसिष्ठाचा नमस्कारपूर्वक निरोप घेऊन तो स्वनगरीस गेला. नंतर

त्याने गणपतिव्रत करण्याला आणि करविण्याला आरंभ केला. या व्रताच्या प्रभावाने त्याला राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न या नांवाचे चार पुत्र झाले. प्रत्यक्ष वैकुंठवासी विष्णु पुत्ररूपाने राजाच्या घरी अवतरला होता. या चारी मुलांनी लहानपणीच दिगंत कीर्ती मिळविली. राजास अति आनंद झाला. शेवटी तो गणपतीच्या स्वानंदलोकाला जाता झाला. त्याच्या राज्यांत दुःखाचे, संकटाचे किंवा तापत्रयाचे नांवच राहिले नाही. मुनिहो ! ह्याप्रमाणे इहलोकी सुख व अंती मोक्षप्राप्ति हे फल हवे असेल तर दशरथाप्रमाणे गणपतीचे व्रत एकनिष्ठपणे केले पाहिजे. असो ! राजाला जसा परमेश्वर प्रसन्न झाला तसा तो सर्व गणेशभक्तांना प्रसन्न होईल असा निश्चय करून प्रत्येकाने गणपतिव्रत करीत राहावे.

## चतुर्थीव्रताचे उद्यापन

**सूतः**- ही कथा झाल्यानंतर मुद्गलाने दक्षाला गणपतिव्रताचे उद्यापन करण्याचा विधि सांगितला. व्रताचे उद्यापन भाद्रपद शुक्ल चतुर्थीला अथवा माघी कृष्ण चतुर्थीला करावे. सामर्थ्य असेल त्या मानाने केळी वगैरे लावून सुशोभित मंडप तयार करावा, छत द्यावे, आरसे लावावे, चोहीकडे दिव्यांचा लखलखाट करावा. मणि, हिरे, मोती इत्यादि रत्नांचे अथवा लतापल्लवांदिकांचे घोस व गुच्छ मंडपभर टांगून ठेवावे. शुक्लचतुर्थी असेल तर मध्यान्ह समयीं किंवा कृष्ण चतुर्थी असेल तर चंद्रोदयाचे वेळी मोठ्या समारंभाने रुप्याच्या अथवा मातीच्या मूर्तीला वस्त्रे नेसवून व सुवर्ण-कलशावर ठेविलेल्या ताम्हणात ठेवून षोडशोपचार पूजा करावी. ही मूर्ति सर्वावयवसंपूर्ण असून सर्व भूषणांनी विराजित असावी.

आचरण शुद्ध असे एकवीस ब्राह्मण मिळवून 'गणानां त्वा' या मंत्राचा जप व अथर्वशीर्षाचा अभिषेक करावा. अनेक प्रकारची वाद्ये वाजत असावी. वेदघोष, शास्त्रप्रवचन व पुराणप्रवचन त्या मंडपांत ठायी ठायी चालले असावे. होमहवन करावे. बलिदान देऊन एकवीस मोदकांची वायने ब्राह्मणांस द्यावी. एकवीस दंपत्ये सांगून त्यास विपुल दक्षणा द्यावी. सव्वाष्णीस चोळया व ब्राह्मणास वस्त्रे द्यावी. गणपतीचे व चद्राचे पूजन करावे व त्याला अर्घ्यप्रदान द्यावे. शुक्ल चतुर्थीचे असेल तर पंचमीला व कृष्ण चतुर्थीला उद्यापन केले असेल तर चद्रोदयाचे वेळी, ब्राह्मणभोजन करावे. रात्री गणेशकथा करावी. गणपति प्रसन्न करण्याकरता दीन, दुबळे, आंधळेपांगळे, इत्यादिकास अन्नसमर्पण करावे ब्राह्मण-भोजन झाल्यावर आपण पूजा केलेली मूर्ति गुरूला दक्षणापूर्वक द्यावी व एकवीस ब्राह्मणास कलश द्यावे, व्रतोद्यापन झाल्यावरही, आमरणांत गणेशभजनपूजन सोडून देऊ नये गणेशभक्ताला केव्हांही दुःखप्राप्ति होत नाही. हा उद्यापनाचा विधि होय.

## लोभासुराचा वृत्तांत–लोभासुरदिग्विजय–गणपतीचा अवतार–लोभासुराचा उद्धार

सूत :–पुढे मुद्गलाने दक्षाला लोभासुर नामक राक्षसाचा गणेशांनी वध केला, ती कथां सांगितली. एकदा पर्वतश्रेष्ठ कैलासावर पार्वतीसह शंकर आपल्या नंदिकेश्वरादि गणमंडळाच्या मध्ये बसून कित्येक ऋषीशी वादसंवाद करीत होता. तेथे अकस्मात स्वर्ग-निधीचा अध्यक्ष व उत्तरदिशेचा स्वामी, जो कुबेर तो शंकराचे दर्शन घेण्याकरिता आला. त्याने शंकरांला व गिरिजेला

नमस्कार करून शंकरावर चवरी ढाळीत तो उभा राहीला. पण त्याच्या दुर्दैवाने तो सर्वांगसुंदर झाला व रूपानें अप्रतिम अशी जी पर्वत कन्या पार्वती तिच्या अति सान्निध्य उभा राहीला असल्यामुळें त्याला मोह उत्पन्न झाला. तो कामातुर झाला. सकाम दृष्टीने त्याने पार्वतीकडे टक लावली. हे पार्वतीस दिसले तेव्हां ती संतापली, रागाने तिचे ओठ फुरफुरूं लागले, डोळे लाल झाले, भिवया वक्र झाल्या व तिचा राग इतका अनावर झाला की, तिच्यानेत्रांतून ज्वालारूपाने बाहेर पडून तो राग कुबेराला भाजता झाला! कुबेरही दुःखशोकाने विव्हल झाला. आपल्या गात्रावरील त्याचे स्वामित्व नाहीसे झाले आणि तेथेच त्याचे स्वामित्व नाहीसे झाले आणि तेथेच त्याचे वीर्यस्खलन होऊन एक सुशोभित असा पुत्र उत्पन्न झाला. राजा! पार्वतीला कुबेराने नमस्कार केला, आणि ती प्रसन्न होईल अशी तिची स्तुती करू लागला. शंकरानींही तिचे समाधान केले. पुष्कळ विनवण्या ऐकून व 'पुनः असे करणार नाही' असे वचन मिळाल्यावर पार्वतीदेवीने कुबेराला क्षमा केली कणि तो त्या मुलाला घेऊन घरी गेला. ब्राह्मणांनी त्या मुलाचे लोभ असे नाव ठेवले. हा मुलगा आपल्या बापाच्या घरी असता त्याला तारासुराने चोरून नेले. हा तारासुर एक राक्षस होता. इंद्राने त्याचा पराभव केला होता म्हणून दुःखी असणाऱ्या या तारासुराला नारदाने सांगितले की, 'कुबेराला लोभ नावाचा एक पुत्र उत्पन्न झाला आहे, त्याचे तू हरण कर. या मुलाचे पालनपोषण तू उत्तम केलेस तर इंद्राचा पराभव होऊन तुझी सर्व मनकामना पूर्ण होईल.' तारासुराला हा उपदेश मानवला. नंतर आत्ताच सांगितल्याप्रमाणे तो लोभाला घेऊन आला आणि त्याचे त्याने प्रेमाने उत्तम लालनपालन केले. हा मुलगा भारी अचपळ! ह्याने लहानपणीच वृक्ष

समूळ उपटावे. हाताच्या चापटीने मोठमोठाले दगड फोडावे. अशी याची अति क्रीडा होती! हा त्याचा पराक्रम पाहून राक्षसांना अति आनंद झाला; आपण कृतकृत्य झालो असे त्यांस वाटू लागले. मुंज झाल्यावर शुक्राजवळ जाऊन वेदांचे अध्ययन, सर्वमोहकमायाविद्येचा अभ्यास, धनुर्विद्येचे संपादन या गोष्टी त्याने केल्या. नंतर पंचाक्षरी-मंत्राची दीक्षा घेऊन वनांत जाऊन त्याने शंकराची दहा हजार वर्षे कडकडीत तपश्चर्या केली की, तो सर्व दाता शंकर त्याला प्रसन्न झाला आणि वर देता झाला की, 'ज्यायोगे त्याला अपूर्व ऐश्व-मिळावे, त्याची प्रकृती निकोप असावी, मनाला आणि वाणींला जे गोचर आहे त्यापासून त्याला मृत्यु नसावा आणि तो सदा सुखी असावा.' हे वर मिळवून आनंदलेला लोभासुर घरी आला व आपल्या मातापितरांस, इष्टमित्रांस आणि सर्व राक्षसजातीस आपल्या वराची हकीगत सांगता झाला. ती ऐकून त्यांनाही अति आनंद झाला. त्रैलोक्याचे स्वामित्व आपण पुन्हा मिळवू अशी बळकट आशा उत्पन्न होऊन त्यांनी दैत्याच्या सिंहासनावर लोभासुराची स्थापना केली व शुक्राकडून त्यास राज्याभिषेक करविला. महिषासुराने तृष्णा नावाची आपली सुंदर कन्या लोभासुराला अर्पण केली. राज्याभिषेक झाल्यावर पृथ्वीवरील सर्व राक्षस एकत्र झाले आणि सभा भरवून तेथे त्रैलोक्यविजय करावयाचा हा सिद्धांत निश्चित केला. संख्या अगणित, जातीने बळकट शस्त्रास्त्रविद्येमध्ये प्रवीण अशी ती राक्षसाची सेना होती. त्यानी हां हां म्हणतां पृथ्वीतील क्षत्रीयांचा पराभव करून तेथे आपले स्वामित्व स्थापन केले. पृथ्वीविजय झाल्यावर लोभाने स्वर्गावर स्वारी करण्याचा संकल्प ठरविला. लोभासुर स्वर्गावर स्वारी करणार ही वार्ता ऐकल्यावर 'देवांच्या हृदयांनी ठावच सोडला.

'मग काय? लोभासुर येण्याचे अगोदरच त्यांनी आपल्या स्थानाचा त्याग केला अर्थातच रक्ताचा एकही बिंदु न सांडता राक्षसांस स्वर्गलोकांचे स्वामित्व आयतेच मिळाले. बृहस्पतीसह इंद्रादि देव वैकुंठास गेल्यावर विष्णूने ब्रह्मदेवास व त्यांस धीर दिला. देवांचे रक्षण करण्यास विष्णू तत्पर असतो. तेंव्हां गरुडावर आरूढ होऊन विष्णूची स्वारी देवांसहवर्तमान अमरावतींवर स्वारी करती झाली. देवदानवांचे अतिघोर व अतिदारूण युद्ध अहोरात्र पांच दिवस झाले. अनेक द्वंद्व युद्धे झाली. विष्णूचे व लोभासुराचे द्वंद्व युद्ध झाले. विष्णू मूर्च्छित झाला आणि त्यास घेऊन सर्व देव पळून गेले. हा पराभव झाल्यानंतर देव शंकरास शरण गेले प्रसन्न होऊन 'भिऊं नका' असे शंकराने त्यांस आश्वासन दिले. इकडे लोभासुराने शिष्टाईसाठी शंकराकडे गजासुरास पाठविण्याचे ठरविले. लोभाने गजासुराबरोबर निरोप पाठविला तो असा. 'शंकरा, तुम्ही आम्हांस पूज्य आहात. आम्हीं आपले भक्त आहोत. आमचा शत्रु विष्णू आपल्या पाठीशी घातला आहे, त्याला आमच्या स्वाधीन करा; नाहीतर आम्हास आपल्याशीं युद्ध करावे लागेल. यालाही कांहीं हरकत नाही. कर्माने आपण श्रेष्ठ झालाना? राक्षसावरही कर्माचा अनुग्रह आहे. श्रेष्ठ-कनिष्ठता कर्माने प्राप्त होते. आम्हीं कर्मसमर्थ आहोत हे विसरू नका आणि विष्णू आम्हास परत द्या.' गजासुराने हा निरोप जशाचातसा शंकरास सांगितला. शंकराने विष्णूस राक्षसांच्या स्वाधीन करण्याचे नाकारले, पण सर्व देवास घेऊन तो कैलास सोडून पर्वताच्या दऱ्याखोऱ्यात राहूं लागला! असेही पुष्कळ दिवस लोटले.

इकडे त्रैलोक्यविजय केल्यावर सर्व राक्षस गर्वाने उन्मत्त झाले व स्त्रिया, मांस व मदिरा इत्यादिकांच्या सेवनामध्ये गर्क होऊन गेले. त्यांची स्वतःची नीती सुटली व त्रैलोक्यांत जे जे लोक त्यांच्या स्वाधीन झाले होते त्यांच्या नीतीचा या राक्षसांनी भ्रष्टाकार केला. यज्ञयागादि कर्मांचा लोप झाल्यामुळे देवादिकास आपआपले हविर्भाग मिळेनात. ह्यामुळेही बिचाऱ्या देवास वनवासापासून होणारे दुःख जास्तच दुणावले. ह्याप्रमाणे त्यांनी बरेच दिवस दुःख भोगले; पुढे त्यांच्या प्रारब्ध उदयाची वेळ आली तेंव्हा 'रैभ्य' ऋषीचे दर्शन त्यास झाले. रैभ्याने देवांस गणेशब्रह्माचा महिमा, गणेशउपासनेचे महत्व, चतुर्थी व्रताचा प्रभाव इत्यादि विघ्नहारक उपायांच्या गोष्टी सांगून त्यास गणेशमंत्राची दीक्षा दिली. देवांनीही भक्तिभावाने एकनिष्ठ उत्तम प्रकारची तपश्चर्या करून गणपतीस प्रसन्न करून घेतले आणि त्याच्या कृपाप्रसादाने इष्ट वरांची प्राप्ति करून घेतली. 'लोभासुराला मारीन' असे गणपतीनी वचन दिले. नंतर गजाननाने शिष्टाई करण्यासाठी शंकराला दैत्यराज जो मोहासुर त्याकडे पाठविले. शंकराने लोभासुराला साम करण्याविषयी उपदेश करून 'गणेश-ब्रह्मापुढे तुझे काही चालावयाचे नाही' असे सांगितले उन्मत्त लोभासुराला हा उपदेश मानवला नाहीच. निरोप घेऊन शंकर परत आला व शिष्टाईचे काम सफल झाले नाही असे गणपतीस त्याने सांगितले. ते ऐकून गणपति क्रोधाविष्ट झाले आणि अग्न्यस्त्र सोडून गणपतीनी राक्षसांची राजधानी जाळण्यास प्रारंभ केला. राक्षसानी मेघास्त्र सोडले, परंतु त्याचा कांहीएक उपयोग झाला नाही; इतकेच नव्हे तर ते मेघोदक तैलरूप झाले आणि अग्नीच्या ज्वाळा जास्तच भडकल्या! लोभासुराचा रथही जळून खाक झाला. हा चमत्कार

पाहून व मनाला आणि वाणीला अगोचर असे हे गणेशब्रह्म आहे असे पाहून लोभासुराचा मद उतरला, त्याचे डोळे उघडले, त्याला पश्चात्ताप झाला, व आपण कर्मलोप व धर्म भ्रष्टकार केला असे समजून त्याला अतिशय दुःख झाले. परंतु शुक्राच्या उपदेशाने त्याला धीर आला. शुक्राने त्यास गणेशस्वरूप समजाविले व ' देवाला शरण गेला नाहीस तर खास मरशील ' असे निश्चयाने सांगितले. तेंव्हा मनाचा निश्चय करून व गणपतीच एक आधार आहे असा निश्चय झाल्यावर तो गणपतीला शरण गेला, भक्तिभावाने गणपतीची त्याने उत्तम स्तुति केली व गणेशाकडून ' गणपतिभक्तांशी तुझा स्नेह होईल. जे लोक कर्माच्या आरंभी माझे स्मरण किंवा पूजन करीत नाहोत त्या लोकांच्या पुण्य कर्मांचे फळ तूं हरण कर ' असे वर मिळविता झाला. हे वर घेऊन व गजाननाला साष्टांग नमस्कार करून शुक्रासहित लोभासुर राक्षस पाताळलोकी गेला. पुढे त्याने आपली उन्मत्तपणाची वागणूक सोडली आणि तो आपला मित्र झाला, हे महत्कृत्य केवळ गजाननाची कृपा ह्मणून झाले, असे जाणून देवांनी गणपतीची दिव्य स्तुति केलीं. आणि पुढे गणपति संप्रदायाचा महिमा वाढवून अखंड भक्तीचा वर मागून घेतला. नतर देव आपआपल्या स्थानी गेले.

## सिंदुरासुराचा जन्म–सिंदुरासुर पृथ्वीचा स्वामी होतो

सूतः– एकदां झोपेतून ब्रह्मदेव जागा झाला असता, त्याला एक जांभई आली. तिच्यापासून सुंदर, तेजस्वी, सुगंधयुक्त असा एक पुरुष उत्पन्न झाला. ब्रह्मदेवाने त्याला पुत्र असे मानले. त्याने त्याचे नांव सिंदुर असे ठेवून त्या मुलाला पुष्कळसे वरही दिले.

त्यामुळे तो सर्वगामी झाला. त्याला हजारो हत्तींची शक्ति प्राप्त झाली, आणि ज्याला तो आलिंगन देईल त्याला ठार मारण्याचेही सामर्थ्य सिंदुराला प्राप्त झाले. ब्रह्मदेवाने त्याला हे जे वर दिले त्याचे कारण, त्याची पूर्वजन्मींची तपश्चर्या हे होय असो, ब्रह्मदेवाचा आशीर्वाद घेऊन निघून जाणार इतक्यात 'कदाचित् आपल्या बापाने आपल्यास फसविले आहे की काय!' हे पाहण्यासाठी तो ब्रह्मदेवाला आलिंगन देण्याकरिता धांवला. तेव्हा आपल्यास मारण्याकरिता हा कृतघ्न पुत्राधम येत आहे असे पाहून ब्रह्मदेवास अनावर क्रोध प्राप्त झाला व त्याने त्याला शाप दिला की, 'शेवटी तुला एकदंताच्या हातून मृत्यु येईल.' हा शाप देऊन ब्रह्मदेव पळून वैकुंठाला निघून गेला. सिंदुरही त्याच्या मागोमाग वैकुंठास आला. वैकुंठवासी विष्णूने त्याचे ते भयंकर स्वरूप पाहून व त्याच्या विरुद्ध आपले काही चालणार नाही असे पाहून नम्र झाला व त्याला सांगितले की 'आम्ही तर तुझ्या स्वाधीन झालोच आहोंत. आमच्या हातून तुला कोणताही उपद्रव व्हायचा नाही ध्यानांत ठेव की, सर्व नाश करणारा शंकर आहे, त्याच्याविषयीं मात्र सावध रहा,' हे ऐकून भोळा सिंदुर कैलासाला गेला तेथे त्याने पाहिले की, शंकर दिगंबर असून ध्यानस्थ बसला आहे. याला मारण्यात काही जीव नाही, असा विचार करून सिंदुराने शंकराची अर्धांगी जी सुंदर पार्वती तिला मात्र घेऊन चालता झाला. पार्वती मूर्च्छित झाली. शिवगणांमध्ये हाःहाःकार झाला, तथापि शंकराचे ध्यान उतरले नाही. इकडे मूर्च्छेतून सावध झाल्यावर पार्वतीने गणेशाचे ध्यान करून त्याला करुणा येईल असे उत्तम स्तोत्र म्हटले. ध्यानातून उठल्यावर शंकरानेही गणपतीची संकट-

विमोचनाबद्दल प्रार्थना केली. या उभयतांच्या प्रार्थनांचा परिणाम असा झाला की, राक्षसाच्या हृदयाला एक मोठा धक्का बसला. त्याला तिरमिरी आली व तो खाली जमिनीवर पडण्याच्या बेतात आला. इतक्यात वाटेने एक ब्राह्मण चालला होता त्याने सिंदुराला हात देऊन उपदेश केला की 'तूं शक्तीला चोरून नेत आहेस. हा शंकर केंव्हा तरीं येऊन तुला गुप्त रूपाने ठार मारींल. तू त्रैलोक्यविजयाला जा. शंकर तुझ्या ताब्यात येईल असे मी करतो.' सिंदुरास हा उपदेश पटला शंकरानेही सिंदुरदैत्याचे वर्चस्व कबूल केले. नंतर सिंदुरासुर भूलोकावर आला आणि सर्व क्षत्रियांचा पराभव करून पृथ्वीचा स्वामी झाला.

## पार्वतीच्या मळापासून पाहरेकऱ्याची निर्मिती

इकडे 'ब्राह्मणरूपाने गणपति अवतीर्ण झाले. व त्यांनीच आपली सुटका केली' असे शंकर भवानीला ज्ञान होऊन दोघांनीही गणपतीचे स्तवन केले आणि अखंड भक्ति, व अभंग शांति हे वर मागून घेतले. तसेच ह्या उभयतांनी आणखी एक मागणे मागितले की, 'आमच्या येथे पुत्ररूपाने आपण अवतीर्ण व्हा' ही प्रार्थना ऐकून गणपतीस आनद झाला व त्यांनी 'तथास्तु' असे म्हटले. पुढे, एक दिवस पार्वती स्नानगृहामध्ये विवस्त्र होवून स्नान करीत असता शंकर एकदम तेथे आला. तेंव्हा ती भारी लज्जाकुल झाली. तिने त्या वेळी आपल्या लज्जेचे कसे तरी रक्षण केले. पुढे तिच्या सख्यांनी तिला सांगितले की, 'केवळ तुझी आज्ञा पाळील असा एक द्वारपाल येथे ठेऊन देऊ. ह्मणजे पुन्हां असा त्रास होणार नाही.' पार्वतीला हे बोलणे खरे वाटले. नंतर तिने आपल्या अंगाची मळी

काढून त्याचा एक पुरुष केला आणि सजीव करून आज्ञा केली, की 'माझ्या परवानगीशिवाय आंत कोणालाही सोडू नको.' ह्याप्रमाणे हा नवीन पुरुष द्वारपाल झाला. त्याने बरेच दिवस शंकरास आंत जाऊ दिले नाही. शंकरानी त्याची आर्जवे केली, लांच देऊ केली, भय घालून पाहिले, परंतु काहीएक उपयोग झाला नाही. शेवटी युद्धावर पाळी येऊन शिवगणासह स्वर्गींचे सर्व देव या पार्वती-स्थापित पुरुषाला दारांतून काढून लावण्याचा प्रयत्न करू लागले. परंतु व्यर्थ! कोणाचेही त्या पुरुषाविरूद्ध काही चालले नाही त्या पुरुषाचे आर्जव करून त्याला तेथून काढण्यासाठी ब्रह्मदेवाने पुष्कळ ब्राह्मण पाठविले; परंतु त्याचेही प्रयत्न विफल झाले. पुढे रागावलेल्या विष्णुशंकरानी त्याच्यावर नेटाने हल्ला केला व शंकराने त्याचे डोके उडविले. पण आपला पुरुष ह्या रीतीने मारला गेला असे पाहून पार्वती रागावली आणि त्रैलोक्याचे भस्म करण्यास सिद्ध झाली हे ऐकून शंकराने नारदादि देवर्षि मध्यस्थीकरिता पाठविले. तेव्हा असे ठरले की, 'त्या मृत पुरुषाला पुन्हा जिवंत करावा.' नतर त्या पुरुषाला जिवंत करण्याचा विधि सुरू झाला. पण शंकराने त्याचे डोके कांपले होते ते कोठे सापडेना. तेव्हां निरुपाय होउन शंकराने आपल्या गणांस सांगितले की, 'तुम्हास जो कोणी प्राणी पहिल्या प्रथम दिसेल त्याला ठार मारून तुम्ही त्याचे मस्तक घेऊन या.' इतक्यांत तेथे एक गजासुर नावाचा राक्षस देवांस त्रास देण्याकरता आला होता, तोच शंकराच्या दृष्टीस प्रथम पडला. शंकराने गजासुराला मारले, व त्याचे डोके घेऊन पार्वतीकृत पुरुषाच्या धडावर ठेवले आणि त्या शरीरात प्राण घालण्यास प्रारंभ केला. सर्व देव, ब्रह्मा, विष्णु व शंकर यापैकी प्रत्येकाने व इतर सर्वांनी मंत्र म्हणून त्या

शरीरात प्राण घालण्याची पुष्कळ खटपट केली, तथापि यश ह्मणून कोणासही येईना. हा प्रकार झाला तेंव्हा मग सर्वांस विघ्नेश्वर गणपतीची आठवण झाली. त्यांनी गणपतिअथर्वशीर्षाचे पुष्कळच पाठ केले, व वेद मंत्र मोठमोठ्याने ह्मणून ओंकाराचे आवाहन केले, तेंव्हा गणपति प्रसादाने त्या शरीरात पंचप्राण प्रवेश करते झाले आणि तो पुरुष जिवंत झाला.

**सूत** :–नंतर मुद्गलाने दक्षाला आपल्या सती नामक कन्येच्या दुसऱ्या जन्माची कथा सांगितली. शिवाय असेही सांगितले की, पर्वताच्या उदरी जन्म घेतल्यावर पार्वतीने शंकरप्राप्तीकरींता मोठी उग्र तपश्चर्या केली. शंकर प्रसन्न होईना. त्याला असे वाटले की, 'पूर्वजन्मी ह्मणजे पार्वती दक्षकन्या सती असतांना, तिने आपली आज्ञा मान्य केली नाही, तसाच ह्या जन्मीही हट्ट धरून बसेल तेंव्हा असली वायको आपण करू नये.' पुढे पार्वतीने बुद्धिदाता जो गणपति ह्याचे ध्यान एक वर्षभर केले व गणपति प्रसन्न झाल्यावर आपल्यास 'शंकरच पति असावा' असे मागणे मागितले. गणपतींनी 'तथास्तु' म्हटल्यावर त्यांच्या शक्तिप्रभावाने शंकराचे मन फिरले आणि पार्वतीस भार्या करण्याचे त्याने मान्य केले. तसेच पार्वतीचे ते भस्मचर्चित, मलिन अंग पाहून तिच्या तपश्चर्येने प्रसन्न झालेला शंकर म्हणाला, हे देवी' तुझ्या अंगाचा मळ सर्वत्र पूज्य होईल.' याच मळापासून पार्वतीने गजाननाचे शरीर निर्माण केले होते.

## गणपतीने गजासुराचे मस्तक धारण करण्याचे कारण

गणपतीने गजासुराचे मस्तक धारण करण्याचे कारण असे आहे; एकदा महेश राजाच्या येथे गुरु बृहस्पति आले असता त्यांचा त्या राजाने अति उत्तम सत्कार केला व अनेक साष्टांग

नमस्कार घातले, म्हणून त्यांनी महेशाला आशीर्वाद दिला की, तुझे मस्तक सर्वत्र पूज्य होईल.' बृहस्पति गेल्यावर बरेच दिवसांनी राजाने नारदाचा अपमान केला म्हणून 'तूं असुर होऊन गजयोनींत तुला जन्म प्राप्त होईल' असा शाप दिला. हा राजा पुढे गजासुर झाला. याच्या तपश्चर्येला प्रसन्न होऊन त्याने मागितले ते वर शंकरानी त्याला दिले. एक मागणे असे होते की, 'मला शेवटी मोक्ष मिळावा व माझे मस्तक सर्वपूज्य व्हावे.' असो; गजासुराला मारून त्याचे मस्तक पार्वतीकृत पुरुषाच्या धडाला चिकटविले ह्मणून त्या पुरुषाला गजानन असे ह्मणतात. हा गणपतीचा अवतार होय.

## गजानन–सिंदुरासुर युद्धात सिंदुरासुराचा अंत

मुनीहो! गणपति सर्व पूज्य ह्मणून त्याचे मस्तकही अर्थातच पूज्य झाले. व शंकरवराचे सार्थक झाले. शंकराने एकदा गणपति-तपश्चर्या केली तेंव्हा गणपतींनी प्रसाद ह्मणून त्याला आपल्या मस्तकावरील निर्माल्य काढून दिला आणि सांगितले की, हा निर्माल्य ज्याच्या मस्तकावर असेल तो सर्वपूज्य होईल. शंकराने त्या निर्माल्याची पूजा केली, दुर्वासानेही केली. पण इंद्राने मात्र त्या निर्माल्याचा अपमान केला ह्मणून त्याचा संपत्तिदेवींने त्याग केला; तो सर्वभ्रष्ट झाला, त्याचा ऐरावत उन्मत्त झाला आणि इंद्राला कोणी विचारीनासे झाले. नंतर त्याचे डोळे उघडले, मद नाहीसा झाला आणि त्याने गणपतीच्या तपश्चर्येला आरंभ केला. तपश्चर्या सिद्ध झाल्यावर निर्माल्याचे माहात्म्य इंद्राला समजले व

निर्माल्याची पूजाच केली पाहिजे, केव्हांही त्याची अवहेलना करता कामा नये, ह्याचे ज्ञान त्यास झाले. पुढे पार्वतीस वर दिला होता त्यास अनुसरून गणपतींनी तिच्या उदरात जन्म घेतला. काही महिने लोटल्यावर सिंदुरासुराने त्या गर्भाच्या मस्तकाचा छेद करून ते मस्तक नर्मदानदीमध्ये टाकून दिले, ह्मणून नर्मदेचे पाणी लालसर आहे व तेथील दगडही लाल असून पूजा करण्यास योग्य झाले आहेत. यालाच ' नर्मदे ' गणपति म्हणतात. इकडे पूर्ण दिवस भरून पार्वती बाळंत झाली, पण बाळाला मस्तकच नव्हते ! तेव्हां विष्णूने उन्मत्त झालेल्या इंद्राच्या ऐरावताचे डोके कापून ह्या बालकाला आणून लावले. असेही वृत्त कोणी ज्ञानी पुरुष सांगतात. असो; ते बालक सजीव झाले हे मागे सांगितलेच आहे. गजाननाचा जन्म होऊन काही दिवस लोटल्यावर एक दिवस नारद सिंदुरासुराच्या येथे गेला आणि ' तुला मारणाऱ्या गजाननाचा अवतार शंकराचे येथे झाला आहे, सावध रहा ' असे सांगून नारद स्वकार्याला निघून गेला. हा वृत्तांत ऐकून सिंदुर क्रोधयुक्त झाला. स्वर्गात जाऊन त्याने तेथील देवांची ठाणी उठविली. ब्रह्मदेवाला, विष्णूला व शंकराला आपापल्या लोकांतून घालवून दिले आणि गजाननाशी युद्ध करण्यास तो राक्षस उभा राहिला. गजाननांनी विकट हास्य करून सिंदुराला मारण्यासाठी विराटरूप धारण केले. आपल्या हजारोंहजार हातांनी त्याला आपले-कडे ओढून घेऊन दोन तळहाताच्या चिकाटीने त्याला धरला, तथेच रगडून त्याला ठार केला व आपले सर्व अंग त्याच्या रक्ताने माखले. सिंदुर मेला असे पाहून देवांस खूप आनंद झाला. देवांनी परमेश्वराची

स्तुति केली व शंकराने मागणे मागितले की, 'आमच्या घरी कैलास-लोकी आपले वास्तव्य सदैव असावे.' 'तथास्तु' असे म्हणून व देवांच्या सर्व कामना पूर्ण करून गणपतीनी विराट् स्वरूपाचे विसर्जन केले.

## विघ्नासुर गणपतीद्वारा पराभूत—विघ्नासुराला गणपतीचे अनेकवर

**सूत** म्हणतातः- मुनिहो ! गणेशांनी जो निर्माल्य शंकरास दिला होता त्यापासून पुष्कळ दिवसपर्यंत स्वर्गातील पुष्पें उत्पन्न होत होती. एकदां नारद इंद्रलोकाला गेला आणि इंद्रास सांगू लागला की, 'हिमालय पर्वतावर अभिनंदन ह्या नांवाचा राजा एक यज्ञ करणार आहे; त्यांत त्याचा विचार तुझा हविर्भाग तुला देण्याचा नाही. असा यज्ञ करणारे पुष्कळसे ब्राह्मणही त्याने जबरदस्तीने मिळविले आहेत. आज उद्या यज्ञाला सुरुवात होईल' हे ऐकून इंद्र फार रागावला आणि त्याने काळाचे स्मरण केले. लागलीच काळ तेथे उपस्थित झाला. नंतर इंद्राने काळाला त्या यज्ञाविषयी वृत्तांत सांगून आज्ञा केली की, 'या यज्ञाचा नाश कर तुझ्या स्वाधीन सर्व जगत् आहे, म्हणून तुला हे सहज जमेल.' काळने इंद्राची आज्ञा मान्य केली आणि विघ्नासुराचे स्वरूप घेऊन तो अभिनंदाच्या यज्ञमंडपांत गेला आणि त्याच्या यज्ञाचा विध्वंस केला, इतकेच नव्हे पण त्याने कर्मभूमीवरील सर्व वैदिककर्माचा लोप केला ! कर्मलोप झाला म्हणजे देवांस संकट पडते. ह्याही वेळी त्यांस प्राणसंकट उत्पन्न झाले, तेंव्हा त्यांनी तप करून, स्तोत्रे म्हणून व ध्यान करून

मोठ्या भक्तीने गणपतीस प्रसन्न करून घेतले. नंतर देवकार्य करण्यासाठी परमेश्वर पार्श्वपुत्र झाला. या पार्श्वाच्या बायकोचे नांव दीपवत्सला होते. त्या दोघांची तपश्चर्या विलक्षण होती म्हणून त्यांचे उदरी हा अवतार झाला हा बालक पांच वर्षांचा झाल्यावर शंकर प्रमुख सर्व देव पार्श्वांच्या येथे येऊन त्याचे त्यांनी अभिनंदन केले आणि 'विघ्नासुराला मारणे आहे, तुझ्या पुत्राला युद्ध करण्यास जाण्याची आज्ञा दे.' पार्श्वाला हे ऐकून गहिंवर आला, दुःख झाले, तो संतापला व 'माझ्या बाळास नेऊ नका' असे तो म्हणणार, इतक्यात गणपति तेथे आले आणि वडिलांची समजूत घालून व आज्ञा घेऊन त्यांनी देवांचे म्हणणे कबूल केले. नंतर गणपतीने विघ्नासुराला आपल्या अंकुशाने पकडून देवाच्या समोर त्याला ओढीत आणले; विघ्नासुर मायावी होता; त्याने अग्नि इत्यादि महाभूतांची रूपें धारण केली; तथापि मायेचा स्वामी जो गजानन, मायाधीश गजानन, राक्षसांच्या मायेचा अधिपत गजानन, त्याने अग्नि, वायु, आकाश, महाकाल, अहंकार, प्रधान या विघ्न-स्वरूपांचा नाश श्रेष्ठ-श्रेष्ठतर स्वरूपे घेऊन केला. शेवटी, 'आपले आता काही चालत नाही' असे पाहून विघ्नासुर गणपतीला शरण आला. त्याने भक्तिपूर्वक गणपतीचे स्तवन केले, 'मी आपलि आज्ञा सदैव पाळीत जाईन' असे वचन दिले, आणि 'आपल्या चरणकमळी माझी भक्ति अखंड असावी, माझे नाव आपण धारण करावे, असे मागणे मागितले. विघ्नाने जे जे मागितले ते गणपतीने त्यास दिले, त्याला आपल्या गणात घेतला, व 'माझे नाव विघ्नराज होईल व त्या नावाचा जप केला असता सर्व सिद्धी प्राप्त होतील.' असे सांगितले आणि शेवटी 'कार्यारंभ झाला असता जेथे माझे स्मरण होत नाही.

कर्म व त्याचे फळ यामध्ये तू विघ्ने आणित जा. शिवविष्णुप्रमुख सकळ देव, सर्व मुनि, सारांश, सर्व प्राणी यापैकी जर कोणी अहंकारयुक्त होईल तर त्यास स्वपदभ्रष्ट करून त्याचे भोग तू खुशाल भोगित जा. माझ्या भक्तास कोणत्याही प्रकारे त्रास देत जाऊं नको ' असे आज्ञापूर्वक वर देते झाले.

## गजानन अवतार समाप्ती

पुढे गजाननांनी मातापितरांचे समाधान करून व ' महाकार्यांचे वेळी माझे स्मरण केले असता मी सदैव सादर होईन ' असे सांगून गणपतीनी आपला अवतार समाप्त केला. मुनिहो ! नंतर मुद्गलऋषिने द्वीपाद्वीपामध्ये व खंडाखंडामध्ये जी गणेशक्षेत्रे आहेत त्यांचे स्थूलमानाने वर्णन केले. नैऋत्यदिशेला भाद्रपद शुद्ध चतुर्थीला देवांनी मध्यान्हकाळी गणपतीची स्थापना केली आहे. ही देवस्थापितमूर्ति सुंदर आहे. सिद्धिबुद्धि ह्या मूर्तिच्या दोन्ही बाजूला आहेत. आठ दिशेला आठ सिद्धीची स्थापना केली आहे. अष्टभैरव व दशदिकपाळ यांचीही स्थाने तेथे आहेत. शिवप्रमुख सर्व देव, काशीप्रमुख क्षेत्रे गंगादि नद्या, तेथे, गणपतीची सेवा करण्याकरिता, गणपतीचे पूजन अर्चन करण्याकरिता व गणपतीच्या कथा गाण्याकरता सदैव सिद्ध असतात. येथील तीर्थात जे स्नान करतील, या क्षेत्राची यात्रा जे करतील, या क्षेत्रात जे राहतील ते गणपतिभक्त कृतकृत्य होतील. गणपतीच्या कथांचे जो श्रवण करतो, त्याला ऐहिक भोगांची प्राप्ति होऊन अंती तो स्वानंदवासी होतो. असा गजाननचरित्राचा महिमा आहे.

( गजाननचरित्र समाप्त. )